अकृषि विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयांतील एकाकी पदांना लागू केलेल्या सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेबाबत.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण- २०१६/प्र.क्र.२६२/१६)/विशि-१
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- १६ फेब्रुवारी, २०१९

वाचा :-

१. शासन अधिसूचना, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. संकीर्ण- २००९/(३२६/०९)/विशि-१, दि.०७.१०.२००९.
२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. वेतन-११०९/प्र.क्र.४१/सेवा-३, दि.०५.०७.२०१०.
३. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.संकीर्ण-२०१०/(४८८/१०)/विशि-१, दि.२८.१२.२०१०.

प्रस्तावना:-

अकृषि विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयीन शिक्षकेतर अधिकारी/कर्मचाऱ्यांना संदर्भाधीन क्र.१ येथील क्र.संकीर्ण-२००९/(३२६/०९)/विशि-१, दिनांक ०७.१०.२००९ च्या अधिसूचनेन्वये दि.०१.०१.२००६ पासून सुधारित वेतन संरचना लागू करण्यात आलेली आहे.

२. राज्य शासकीय व जिल्हा परिषदांतर्गत एकाकी पदावरील कर्मचाऱ्यांना सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना एकाकी पदांना लागू करण्याबाबतचे सुधारित आदेश वित्त विभाग संदर्भाधीन क्र.२ येथील क्र. वेतन-११०९/प्र.क्र.४१/सेवा-३, दि.०५.०७.२०१० च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेले आहेत.

३. वित्त विभागाच्या उपरोक्त नमूद शासन निर्णय दि.०५.०७.२०१० मधील सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेबाबतच्या तरतूदी अकृषि विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयातील शिक्षकेतर अधिकारी/कर्मचाऱ्यांना, उपरोक्त संदर्भ क्र.३ येथील उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या दि.२८.१०.२०१० च्या शासन निर्णयान्वये जशास जशा लागू करण्यात आलेल्या आहेत. तथापि सदरहू शासन निर्णय निर्गमित करण्यापूर्वी वित्त विभागाची मान्यता घेतलेली नसल्याने, सदर शासन निर्णय पूर्वलक्षी प्रभावाने रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

संदर्भाधीन क्र.३ येथील दि.२८.१२.२०१० रोजीचा शासन निर्णय पूर्वलक्षी प्रभावाने रद्द करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्र.२०१९०२१५१६२४३०८१०८ आहे. हा शासन निर्णय डिजीटील स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay Eknath Sable

Digitally signed by Vijay Eknath Sable
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ad74dd20b49c8ab0bc83f54f3d9c91571a6cd47aeb9a9f05783d44cafe7a7d8e, serialNumber=ad8df0c87ab8e6c9f8574ab838dd4c466ebe81828f43e76bfa02129f8e862cd2, cn=Vijay Eknath Sable
Date: 2019.02.16 15:40:36 +05'30'

**(विजय साबळे)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई,
२. मा. मुख्य मंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. कुलगुरू, सर्व अकृषि विद्यापीठे,
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई-१, महाराष्ट्र, (५ प्रती),
५. महालेखापाल (लेखा परीक्षा) मुंबई-१, महाराष्ट्र, (५ प्रती),
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर-२, महाराष्ट्र, (५ प्रती),
७. महालेखापाल (लेखा परीक्षा) नागपूर-२, महाराष्ट्र, (५ प्रती),
८. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
९. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण,
१०.कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे,
११.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१२.मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे विशेष कार्य अधिकारी,
१३.मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव,
१४.उच्च व तंत्र शिक्षण विभागातील सर्व कार्यासने,
१५.निवड नस्ती (विशि-१)